# डार्विनचा उत्क्रान्तिवादी सिद्धांत खरा आहे काय?

## ... तरच डार्विनचा उत्क्रान्तिवादी सिद्धांत खरा मानता येईल

**E Book 166**

**प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या आगामी पुस्तकातील**

**क्रमशः लेखन प्रस्तूत**

**भाग १**




एकोणिसाव्या शतकात रॉबर्ट हुदिन व इतर अनेक त्या काळातील जादूगार मृतात्म्यांना बोलावल्या जाणाऱ्या ‘सीअन्स ‘नावाच्या खास बैठकीमध्ये मृतात्म्याकडून केले जाणारे (टेबल आपोआप अंतराळी उचलले जाणे इत्यादी) चमत्कार स्वतच्या जादूने करून दाखवण्याबद्दल प्रसिद्ध होते. लंडनच्या मृतात्मवादी (Spirituallist) संघाचा ऑनररी सेक्रेटरी अल्गेरनॉन जॉय याने त्यांना आव्हान दिले की आमच्या अटीखाली मृतात्मे करीत असलेले प्रकार करून दाखवावेत व आमचे त्यासाठीचे एक सहस्त्र पौंडाचे खास बक्षीस जिंकावे. जॉयचे ते आव्हान अर्थात कोणत्याही जादूगाराने स्वीकारले नाही. स्वीकारणे शक्य नव्हते. कारण त्यांची जादू मृतात्मे करीत असलेली खरी जादू नव्हती. ती प्रेक्षकांची फसवणूक होती. तथापि त्यांचे म्हणणे असे होते की मृतात्म्याच्या नावाखाली केले जाणारे सर्व चमत्कार हीसुद्धा फसवणूक असते; आणि तेच आम्ही आमच्या 'युक्त्या' वापरून सिद्ध करून दाखवीत असतो. यावर ब्रह्मविज्ञानवादी मॅडम एच्. पी. ब्लॅव्हेट्स्की यांनी त्यांना असे आव्हान दिले : 'सीअन्स' च्या अंधाऱ्या खोलीत मृतात्म्यांचे चमत्कार बाजूला राहू द्या. भारतीय जादूगार दिवसा पूर्ण प्रकाशात जे जादूचे प्रयोग करतात ते त्याच परिस्थितीत करून दाखववावे. भारतीय जादूगार करीत असलेल्या अनेक जादूच्या प्रयोगापैकी तीन प्रयोग पाश्चिमात्य जादूगारांसाठी ब्लॅव्हेट्स्कीनी आव्हान म्हणून निवडले होते( हे तीन्ही प्रयोग एका भारतीय जादूगाराने प्रिन्स ऑफ वेल्स व त्यांचे सेवक लोक यांच्यापुढे इंग्लंडमध्ये काही दिवसापूर्वी प्रत्यक्षात करून दाखवले होते.) ब्लॅव्हेट्स्कींनी निवडलेले व प्रिन्स ऑफ वेल्सपुढे भारतीय जादूगाराने करून दाखवलेले



मॅडम हेलेना ब्लॅव्हेट्स्की

## तीन प्रयोग असे:

१. संशयवादी प्रेक्षकाने आपल्या मुठीत घट्ट धरलेला रुपाया विषारी नागसापात रूपांतर करणे. तो नाग विषारी असल्याची त्याच्या दातांची परीक्षा करून नंतर खात्री करणे.

२. प्रेक्षकांनेच निवडलेले कोणत्याही फळझाडाचे बी त्यानेच आणलेल्या फुलपात्रात पेरून त्यापासून रोपटे उगवणे, ते वाढवणे व त्याला फळे लागणे, ही गोष्ट पंधरा मिनिटात करून दाखवणे.

3 ज्यांच्या मुठी जमिनीत रोवलेल्या आहेत व टोके आकाशाकडे वर आहेत अशा तीन तलवारीवर माणूस पाठीवर झोपणे. प्रथम डोक्याखालील तलवार काढून घेणे, नंतर दुसरी तलवार काढून घेणे व शेवटी तिसरी तलवारही काढून घेणे व माणूस तसाच हवेत झोपलेला राहणे.

हे आव्हान हुदिन वा इतर कोणत्याही जादूगाराने स्वीकारणे शक्य नव्हतेच. पण हे आव्हान देऊन पाश्चिमात्य लोक ज्या त्यांच्या भौतिक विज्ञानाचा व त्याच्या अनुल्लंघनीय नियमांचा गर्व बाळगतात ते विज्ञान व त्याचे नियम कसे तकलादी ( मिथ्या) आहेत, हे ब्लॅव्हेट्स्कींना भारतीय जादूगारांच्या या प्रयोगांनी जगाला दाखवून द्यावयाचे होते. कारण हे आव्हान देऊन त्यांनी पुढे असे म्हटले आहे की मृतात्मा खोटा म्हणणारा हुदिनीच नव्हे, कोणत्याही पाश्चिमात्य जादूगाराने आपल्या 'युक्त्या' वापरून वरील चमत्कार करून दाखववावेत. ते चमत्कार करून दाखवले तरच, ...होय, तरच हक्सले म्हणतो त्याप्रमाणे मानवाची रानटी घोड्यापासून उत्क्रांती झाली आहे, (म्हणजेच डार्विनचा उत्क्रांतिवाद खरा आहे) हे आम्ही मान्य करू. (Isis Unveiled, Vol I. Pp 73-74)

## लेखकाचा याच तीन चमत्कारांचा अनुभव

एखादा मुद्दा वाचकांना पटवून देण्यासाठी मी इतरांच्या तथाकथित चमत्कार सांगणाऱ्या ग्रंथांचा आधार घेतो असे वाचकांना वाटेल म्हणून सांगू इच्छितो की ब्लॅव्हेट्स्कीनी वर उल्लेख केलेले भारतीय जादूगारांचे इंग्लंडमध्ये केलेले तीनही प्रयोग मी प्रत्यक्ष स्वतः माझ्या गावी भोज येथे पाहिले आहेत. (स्वातंत्र्यपूर्व काळात

अनेक जादूगार खेडोपाडी रस्त्यावर असे जादूचे प्रयोग करीत असत.) मी पाहिलेला वरील प्रयोगापैकी  पहिला प्रयोग असा: जादूगार आपल्या पोतडीतून एक पत्र्याचा डबा बाहेर काढतो व त्याचे टोपण काढून तो मोकळा असल्याचे सर्वांना दाखवतो. नंतर एक कागद घेऊन तो त्या मोकळ्या डब्यात घालून पेटवतो व कागद जळत असतानाच टोपण घालून तो डबा बंद करतो.
थोड्या वेळाने तो त्या डब्याचे टोपण काढतो.तेव्हा त्यातून दोन कबुतरे बाहेर पडतात व उडून जमिनीवर बसतात. ते बराच वेळ जमिनीवर बसून असतात. नंतर त्यांना परत डब्यात घालून जादूगार डबा बंद करून पोतडीत ठेवून देतो . मुठीत  धरलेल्या रुपयाचे नाग सापात रूपांतर करण्याच्या जागी कागद जाळून त्याचे कबूतरात रूपांतर करणे, हा फरक फक्त या प्रयोगात आहे. दोन्ही प्रयोगात जीवशास्त्राच्या नियमांचा उघड भंग सारखाच आहे.
दुसरा प्रयोग असा: जादूगार आपल्या सोबत्याला  जमिनीवर पाठीवर झोपवतो व त्याचे शरीर कापडाने पूर्ण झाकतो. नंतर त्याच्या पायाकडील बाजूला बसून आपला उजवा हात त्या झोपलेल्या माणसाच्या दिशेला पसरून हातात काहीतरी घेतल्याप्रमाणे त्याची मूठ करतो व  आपल्याकडे ती जोराने खेचतो व नंतर ती मूठ उघडून ते,' काहीतरी' त्याच्या डोक्याच्या दिशेला फेकतो. असे अनेक वेळा तो करतो. हे करीत असताना त्याला इतके श्रम झालेले दिसतात की त्याचा चेहरा  त्या श्रमाने अक्षरशःलालभडक होतो. ही कृती चार-पाच वेळा केल्यानंतर झोपलेल्या मनुष्याचे शरीर एकदम झोपलेल्या अवस्थेतच चार-पाच फूट आपोआप वर उचलले जाते व वर जातच राहते. ते  फार वर जाऊ नये म्हणून की काय तो जादूगार चटकन उठून हाताने त्याचे पोट वरून  दाबतो. त्यासरशी ते शरीर परत हळूहळू खाली जाते व परत जमिनीवर टेकते. या  प्रयोगातील व मागे सांगितलेल्या प्रयोगातील फरक असा की माणूस अंतराळात झोपून राहण्याऐवजी झोपलेल्या अवस्थेतच तो वर उचलला जातो. पण दोन्ही प्रयोगात भौतविज्ञानाच्या  गुरुत्वाकर्षण शक्तीच्या नियमाचा उघड भंग सारखाच आहे.

तिसरा प्रयोग म्हणजे आंब्याची कोय पेरून त्यापासून आंब्याचे रोप उगवणे, ते दीड दोन फूट वाढणे व त्याला आंबे लागणे हा प्रयोग केवळ पंधरा मिनिटात दुसऱ्या एका

जादूगाराने केलेला मी भोज येथेच पाहिला आहे. ब्लॅव्हेट्स्की यांनी म्हटले आहे की 'माझ्या अटी खाली माझ्या खोलीत भारतीय जादूगारांनी केलेला हा प्रयोग मी अनेकदा भारतात (व तिबेटमध्ये ही) पाहिला आहे'. हा प्रयोग नजरबंदीचा म्हणजे सामूहिक संमोहनाचा (mass hypnotism) नसल्याची खात्री रोपट्याला लागलेले आंबे तोडून खाऊन करता येत असून अशा प्रयोगांची माहितीही ब्लॅव्हेट्स्कीनी दिली आहे. (Isis,I p.14)

## हे प्रयोग डार्विनचा उत्क्रांतीवाद खोटा कसे ठरवतात.

वरील तीन प्रयोग, जे भारतीय जादूगार दिवसा रस्त्यावर करून दाखवतात, पाश्चिमात्य जादूगारांनी त्याच परिस्थितीत करून दाखवले तर... तरच डार्विनचा उत्क्रांतिवाद खरा आहे हे मान्य करू, असे ब्लॅव्हेट्स्कींनी का म्हटले आहे? कारण डार्विनचा उत्क्रांतिवाद भौतिकवादी (materialist) असून तो जीवाची उत्पत्ती व उत्क्रांती निसर्ग निवडीच्या (natural selection) आंधळ्या तत्त्वानुसार झाली असल्याचे प्रतिपादन करतो.*[1]पाश्चिमात्य शास्त्रज्ञ, ज्यामध्ये पाश्चिमात्य जादूगारांचाही समावेश होतो - भौतिक विज्ञानाचे कट्टर समर्थक असतात. (आजही आहेत.) परिणामी भौतिकवादावर आधारलेल्या डार्विनच्या उत्क्रांतीवादाचेही ते समर्थन करीत असतात. कारण भौतिकवाद( जडवाद) हेच या विश्वाचे अंतिम वैज्ञानिक सत्य असल्याचे ते मानतात. पाश्चिमात्य भौतिक विज्ञानाने शोधलेल्या भौतिक- म्हणजे जड वा आंधळे- नियम हेच या विश्वातील अंतिम नियम असून ते अबाधित वा अनुल्लंघनीय आहेत असा त्यांचा दावा असतो. मृतात्मवाद्यांच्या बैठकीतील (टेबल आपोआप अंतराळात उचलले जाणे इत्यादी) चमत्कार हे वास्तविक मृतात्म्यांचे चमत्कार नसून - कारण मृतात्मा मुळातच खोटा आहे, तो अस्तित्वात नाही - ती त्यांची हातचलाखी असते, असे त्यांचे म्हणणे असते.

---

[1] *" The purpose manifested in evolution, whether in adaptation, specialisation biological progress is only... a product of blind forces." (Evolution: The Modern Synthesis- Julian Huxley 1963, p. 567) उत्क्रांतीमध्ये दिसून येणारा हेतू, मग तो परिस्थितीशी जुळवून घेणे असो, नवीन जाती निर्माण करणे असो, अगर जैविक प्रगती करणे असो, केवळ **आंधळ्या शक्तीमुळे** घडून येतो." यालाच निसर्ग निवडीचे तत्त्व म्हणतात.

असले चमत्कार स्वतःच्या युक्त्या वापरून करून दाखवणाऱ्या हुदिनी सारख्या जादूगारांचा दाखला, मृतात्मा खोटा असल्याबद्दलच्या व वैज्ञानिक भौतिकवाद व त्यावर आधारलेला डार्विनचा उत्क्रांतिवाद खरा असल्याबद्दलच्या समर्थनार्थ देण्यात येतो. पाश्चिमात्यांच्या या तथाकथित वैज्ञानिक भौतिकवादालाच ( scientific materialism) ब्लॅव्हेट्स्कींनी भारतीय जादूगारांच्या जादूच्या प्रयोगांच्या रूपाने आव्हान दिले आहे. कारण भारतीय जादूगारांच्या प्रयोगांचे अधिष्ठान पाश्चिमात्य शास्त्रज्ञ म्हणतात त्याप्रमाणे, 'युक्त्या' (tricks) नसून आत्मतत्त्व आहे, हे ब्लॅव्हेट्स्कींना पाश्चिमात्य "भौतिकवादी जगाच्या निदर्शनास आणून द्यावयाचे आहे . ते आत्मतत्त्वच या विश्वाचे अंतिम सत्य असून त्याचे नियम हेच अंतिम व अनुल्लंघनीय नियम असल्याचे भौतिक विज्ञानाचे तथाकथित अनुल्लंघनीय नियम ते (आत्मतत्त्व ) उघडपणे उल्लंघून दाखवून देते .त्यामुळे त्या (भौतिक) नियमावर आधारलेला डार्विनचा उत्क्रांतीवाद आपोआपच खोटा ठरतो असे ब्लॅव्हेट्स्कीं यांचे प्रतिपादन आहे अन्यथा अधांतरी माणूस झोपणे किंवा झोपलेला माणूस आपोआप अंतराळी उचलला जाणे, पंधरा मिनिटात बियापासून रोप उगवणे, वाढणे व त्याला फळे लागणे; रुपयाचे नागसापात रूपांतर करणे किंवा जळलेल्या कागदाचे कबूतरात क्षणात रूपांतर करणे या गोष्टींची उपपत्ती भौतवैज्ञानिकांना भौतिक तत्त्वांच्या आधारे देणे कसे शक्य आहे? पण मग आत्मतत्वाचे विज्ञान (ब्रह्म विज्ञान) या गोष्टींची उपपत्ती कशी देते, की ज्यामुळे डार्विनचा भौतिक (जड वा आंधळ्या) नियमांवर आधारलेला उत्क्रांतिवाद( ते नियम उल्लंघिले जात असल्यामुळे) खोटा म्हणता येईल? ब्लॅव्हेट्स्कींनी उत्क्रांतीची आत्मतत्वाची( ब्रह्मवैज्ञानिक ) उपपत्ती दिली असून ती त्यांच्याच शब्दात देत आहे. त्या म्हणतात:

" The whole order of nature evinces a progressive march towards a higher life. There is a design in the action of the seemingly blindest forces. The whole process of evolution with endless adaptations is a proof of this. The immutable laws that weed out the weak and feeble species, to make room for the

strong, and which ensure the "survival of the fittest" though cruel in their immediate action- all are working towards the grand end. The very fact that the adaptations do occur,that the fittest do survive, in the struggle for existence shows that what is called "unconscious nature" is in reality and aggregate of forces manipulated by semi- intelligent beings (Elementals) guided by High Planetary Spirits (Dhyani Chohans), whose collective aggregate forms the manifested verbum of the unmanifested LOGOS, and constitutes at one and the same time the MIND of the Universe and its immutable LAW " (The Secret Doctrine I, Pp. 277-8)

याचा अर्थ असा: “उच्चतर जीवनाकडे सतत प्रगतीशील वाटचाल होत राहणे ही निसर्गाची व्यवस्था असल्याची दिसून येते. पूर्ण आंधळ्या शक्तींनी हे कार्य चालत असल्याचे वरवर दिसत असले तरी त्याच्या पाठीमागे सूत्रबद्ध योजना आहे. परिस्थितीशी जुळवून घेण्याची कधीही न संपणारी जीवाच्या उत्क्रांतीची प्रक्रिया हा याच योजनेचा पुरावा आहे. दुर्बल व अशक्त जीव जातींचे नामशेष होणे व  सबल व सशक्त जीव जातींनी त्यांची जागा घेणे, म्हणजे जीवनाचा झगड्यात सामर्थ्यवान जीवजाती टिकून राहणे, हा उत्क्रांतीचा अपरिवर्तनीय नियम असून तो प्रत्यक्षात क्रूर दिसत असला तरी अंतिमतःभव्य व उदात्त ध्येयाकडील वाटचालीचा तो निदर्शक आहे. जीवनाच्या झगड्यात जे जीव परिस्तिथीशी जुळवून घेतात तेच टिकतात ही  वस्तुस्थिती हे दाखवून देते की अत्यंत आंधळे (दिसणारे) निसर्ग नियम हे वास्तविकरीत्या  जाणीव युक्त निसर्ग नियमांची कारागिरी आहे. ते निसर्गात्मे उच्च स्थानीय ग्रहाधिपतींच्या मार्गदर्शनाखाली आपली ही कामगिरी करीत असतात. हा ग्रहाधिपतींचा समुदाय म्हणजे अप्रकट ईश्वराचे नामरूपात्मक प्रगट जग असून तेच या विश्वाचे मन आहे. त्याच वेळी ते( विश्वाचे)  न बदलणारे ( अंतिम) नियम ही आहे.”

## उत्क्रांतीचे अधिष्ठान आध्यात्मिक

ब्लॅव्हेट्स्की यांनी दिलेल्या वरील उत्क्रांतीच्या ब्रह्मवैज्ञानिक उपपत्तीतून पुढील गोष्टी स्पष्ट होतात.

एक: या दृष्य जगातील अणुरेणूत अप्रकट ईश्वर(Logos) भरला (व्याप्त) असून हे नामरूपात्मक जग (verbum) म्हणजे त्या अप्रकट ईश्वराचेच प्रकट रूप आहे व त्याची उच्चतर अवस्थेकडे निरंतर प्रगती होत आहे. याचा अर्थ असाही होतो की हे विश्व म्हणजे ईश्वराचे मनच (वैश्विक मन) असून विश्वाच्या प्रगतीच्या दिशेने होणाऱ्या उत्क्रांतीचा नियम ईश्वराच्या या मनातून (किंवा मनाप्रमाणे) चालतो.

दोन: उत्क्रांतीचा ईश्वरी (वैश्विक) मनरुपी नियम अमलात आणण्याचे कार्य करणारी ईश्वराच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्यांची एक उतरंड असून त्या उतरंडीच्या अत्युच्च स्थानी ग्रहाधिकारी आत्मे (Planetary Spirits) आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाखाली इतर दुय्यम आत्मे (elementals) ते ईश्वरीय नियम प्रत्यक्ष अमलात आणण्याचे काम करीत असतात. पुढे ब्लॅव्हेट्स्कींनी हेही सांगितले आहे की ह्या दुय्यम आत्म्यांना निसर्गात्मेही (nature spirits) म्हणत असून त्यांची संख्या अगणित आहे. तसेच ग्रहाधिकाऱ्यांना लोकपालही म्हणत असून ते इंद्र, वरूण, यम, कुबेर, सूर्य, सोम (दृष्य सूर्य, सोम नव्हे) इत्यादी नावांनी प्रसिद्ध आहेत. ते कर्माचे फळ देण्याचे कार्यही करतात. या सगळ्याचा अर्थ असा की उत्क्रांतीसह विश्वाचे सर्व कार्य पाश्चिमात्य भौतवैज्ञानिक म्हणतात त्याप्रमाणे भौतिक वा आंधळ्या नियमांनी चालत नसून ईश्वरीय म्हणजे दैवी (divine) नियमांनी चालते. म्हणजेच हे नियम ईश्वरी असल्यामुळे डोळस आणि जाणीवयुक्त आहेत. भौत वैज्ञानिक म्हणतात त्याप्रमाणे भौतिक म्हणजे आंधळे वा जड नाहीत. ते नियम भौतिक, म्हणजे आंधळे वा जड असते तर अनुल्लंघनीय (अबाधित) ठरले असते. म्हणजे उदाहरणार्थ उभ्या तलवारीवर झोपलेल्या माणसाच्या शरीराखालून तलवार काढून घेताच ते शरीर त्या आंधळ्या (जड) नियमानुसार जमिनीवर कोसळले असते. पण ते कोसळत नाही. याचा अर्थ गुरुत्वाकर्षण शक्तीचा नियम आंधळा नाही; डोळस व जाणीवयुक्त आहे, म्हणजेच आत्मायुक्त (अध्यात्मिक) आहे, असा होतो. कारण तो नियम आध्यात्मिक तरबेज(adept) जादूगारांच्या आत्म्याची(आध्यात्मिक) आज्ञा पाळतो. (जादूगार तरबेज नसेल तर त्याने वश केलेल्या निसर्गात्म्याची आज्ञा - तीही अध्यात्मिकच

असल्यामुळे पाळतो) व आपले भौतिक कार्य स्थगित करतो. इतकेच नव्हे तर मी पाहिलेल्या जादूगाराच्या प्रयोगात तो नियम उलट ते शरीर वर उचलतो! म्हणजे आपल्या (गुरुत्वाकर्षण या भौतिक) गुणधर्माच्या विरुद्ध वागतो! आपल्या भौतिक स्वभावाच्या विरुद्ध कार्य करतो! अर्थात सामान्य मनुष्याच्या दृष्टीने यामध्ये गुरुत्वाकर्षण शक्तीच्या नियमाचा भंग असल्यामुळे हा चमत्कार असला तरी आध्यात्मिक दृष्टीने तो चमत्कार नसूनआध्यात्मिक नियमांचे ते पालनच आहे. किंबहुना भौतिक नियमावर आधारलेले जग मायिक( मिथ्या) असल्याचे सिद्ध करणारा व अंतिमआध्यात्मिक सत्याच्या नियमांचे दर्शन घडवणारा तो ब्रह्मवैज्ञानिक प्रयोग आहे. म्हणूनच ब्लॅव्हेट्स्कींनी जादूला spiritual wisdom (आध्यात्मिक ज्ञान) म्हटले आहे. (Isis II p.590) जादू हेआध्यात्मिक ज्ञान असल्याचे दुसरे प्रत्यंतर म्हणजे जादूला प्रतिशब्द 'इंद्रजाल' हा असून तो ऋग्वेदातील 'इंद्रः मायाभिः पुरुरूप ईयते ।' (ऋ. VI. 47.18)
( ईश्वर मायेने - जादूने - अनेक रूपे धारण करतो, म्हणजे नामरुपात्मक जग मायेने निर्माण करतो) या सूक्तावरून भारतीय भाषात रूढ झाला आहे, हे होय. याचेच आणखी एक प्रत्यंतर म्हणजे शंकराचार्यांनी परमात्मा व जीवात्मा (खरे जग व खोटे जग) यातील फरक ओळखण्यासाठी ब्रह्मसूत्रावरील आपल्या भाष्यात प्रसिद्ध भारतीय 'दोरीच्या जादू' चे उदाहरण दिले आहे, हे होय. ब्रह्म सूत्रातील 'भेदव्यपदेशाच्च ।' (ब्र. सू. I. 1.17) या सूत्रावर भाष्य करताना हे उदाहरण दिले असून हे जग ईश्वराने मायेने (जादूने) कसे निर्माण केले आहे, हे दाखवून देत असल्यामुळे त्याची येथे थोडक्यात माहिती देणे क्रमप्राप्त आहे.

## प्रसिद्ध भारतीय 'दोरीचा आध्यात्मिक प्रयोग'

जादूगार आपल्या पोतडीतील दोरी काढून ती आकाशात फेकतो. ती खडी होऊन वर जात राहते व तिचे शेवटचे टोक आकाशात दिसेनासे होते. जादूगार आपल्या मुलाला त्या दोरीवर चढायला सांगतो. मुलगा दोरीवर चढून तोही दिसेनासा होतो. थोड्यावेळाने जादूगार त्याला खाली उतरायला ओरडून सांगतो. पण तो काही खाली उतरत नाही. तेव्हा स्वतःजादूगार एक सुरी घेऊन दोरीवर चढतो व तोही

दिसेनासा होतो. नंतर त्या मुलाचा एक हात खाली पडतो. नंतर दुसरा हात पडतो. नंतर एक पाय पडतो. नंतर दुसरा पाय पडतो. नंतर धड पडते. व शेवटी मुंडके पडते. जादूगार खाली उतरून मुलाचे ते सर्व अवयव गोळा करून एका टोपलीत भरतो व ती उपडी करतो. लगेच त्यातून मुलगा पूर्वी होता तसा बाहेर पडतो. ब्लॅव्हेट्स्कींनी आपण हा प्रयोग अनेकदा पाहिला असल्याचे म्हटले असून हे सर्व भ्रामक असले तरी प्रेक्षक आपण पाहतो ते सर्व खरे असल्याचे शपथपूर्वक सांगतात असेही म्हटले आहे. (Isis I, p.474, II p.588) रस्किन बाँड या प्रसिद्ध लेखकाने बऱ्याच वर्षांपूर्वी हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या कळशी या खेड्यात आपण हा दोरीच्या जादूचा प्रयोग पहिला असल्याचे एका लेखात वर्णन करून सांगितले असून तो लेख, 'टाईम्स ऑफ इंडिया'ने रविवार ९ डिसेंबर 2018 च्या अंकात (कोल्हापूर आवृत्ती) प्रसिद्ध केला आहे. भौत वैज्ञानिक याला mass hypnotism (सामूहिक संमोहन किंवा नजरबंदी) म्हणतात. म्हणजे हे खोटे दृश्य असते असे सांगतात. पण प्रत्यक्ष प्रमाण हे भौतविज्ञानाच्या दृष्टीने सत्याचे प्रमाण असल्यामुळे हे प्रमाण येथे सत्याचे प्रमाण म्हणून का मानु नये याचे स्पष्टीकरण भौतवैज्ञानिकांनी दिले पाहिजे. पण त्यांना ते देता येत नाही. संमोहन प्रयोगात मनाला सूचना केली की मन ती सूचना पाळते व तसे दृश्य प्रत्यक्षात दिसते. पण ते भ्रामक (मनोनिर्मित) असते, असे ते म्हणतात. पण या दोरीच्या प्रयोगात जादूगाराने प्रेक्षकांना कसलीही सूचना केलेली नसताना वर वर्णन केलेले विशिष्ट प्रकारचे दृश्य त्यांना दिसते, हे कसे? याला भौत वैज्ञानिकांकडे किंवा मानसशास्त्रज्ञांकडेही उत्तर नाही; आणि ते असू शकत नाही. कारण हा भौत विज्ञानाचा किंवा मानसशास्त्राच्या सूचनेचा प्रयोग नसून अध्यात्म (ब्रह्म) विज्ञानाचा मायावी (संमोहन) प्रयोग आहे; आणि हा प्रयोग ईश्वरानेच हे जग निर्माण करताना केला असल्याचे भगवद्गीता पुढील श्लोकात स्पष्टच सांगते:

इच्छा द्वेष समुत्थेन द्वंद्व मोहेन भारत।

सर्व भूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप।।(भ. गी. ७.२७)

म्हणजे इच्छा द्वेषाच्या( ईश्वराने निर्माण केलेल्या) खोट्या(मायिक) द्वंद्वामुळे( आध्यात्मिक- जादूच्या- प्रयोगामुळे) सर्व प्राणी जगाच्या उत्पत्तीच्या वेळी

अज्ञानी बनतात. (म्हणजे हे जग मायेने निर्माण केलेले असताना त्याला ते खरे समजतात - जसे दोरीच्या प्रयोगातील दृष्य खोटे असताना प्रेक्षक ते खरे समजतात.) अशारितीने दोरीच्या जादूने खोटे दृश्य( म्हणजे अज्ञान) निर्माण करणारा जादूगार आपल्या या प्रयोगाने, खोटे जग( अज्ञान) निर्माण करणाऱ्या ईश्वराचेच  पात्र वठवतो हे उघड आहे. म्हणून ब्लॅव्हेट्स्कींनी म्हटले आहे की 'जसे ईश्वर निर्माण करतो तसे मनुष्यही  निर्माण करू शकतो'.  ( As God creates so man can create. Isis I p.62)

कारण मनुष्य प्रच्छन्न ईश्वरच आहे. एरवी रुपयाचा नागसाप करणे, किंवा जळालेल्याकागदाचे कबूतर करणे, बी पेरल्यानंतर पंधरा मिनिटात त्यापासून रोपटे उगवणे, वाढणे व त्याला फळे लागणे, या गोष्टी कशा शक्य आहेत? वर उल्लेख केलेल्या रस्किनबाँडच्या लेखात जादूगाराने आकाशातून नारळांचा वर्षाव केला असल्याचेही म्हटले असून बाँडने एक नारळ हातात घेऊन पाहिला असल्याचे म्हटले आहे, ज्यामुळे हा केवळ मनोनिर्मित देखावा नसल्याचे सिद्ध होते. ब्लॅव्हेट्स्कींनी सुद्धा स्वतःअसाच एक प्रयोग काशीत केला आहे. मॅक्समुलरचा शिष्य व बनारस कॉलेजचा प्रिन्सिपाल थीबो हा जर्मन पंडित, आर्यसमाजचे संस्थापक दयानंद सरस्वती व इतर अनेक प्रतिष्ठित लोकांच्या उपस्थितीत त्यांनी हवेत हात फिरवून गुलाबांची पुष्पवृष्टी केली आहे. ती गुलाबाची फुले सर्वांनी वेचून घेतल्यामुळे व थीबोना एकही  फूल न मिळाल्यामुळे थिबोनी ब्लॅव्हॅट्रस्कींना पुन्हा तशी पुष्पवृष्टी करण्याची विनंती केली. तेव्हा ब्लॅव्हेट्स्कींनी पुन्हा हवेत हात फिरवून थेट थीबो यांच्या शरीरावरच गुलाबपुष्पांची वृष्टी केली! (Old Diary Leaves II Pp. 130-1)




आदमापूर (ता. कागल जि. कोल्हापूर) येथे 1966 साली महासमाधी घेतलेल्या व संत

बाळूमामा या नावाने प्रसिद्धी पावलेल्या धनगर समाजातील व्यक्तीने बकऱ्यांच्या तळावरील हंड्यातील कण्या बकरी राखणाऱ्या धनगरांना पुरेनाशा झाल्यामुळे त्या हंड्याला आपल्या पायताणाने मारून 'कण्या पुरल्या पाहिजेत' अशी आज्ञा केली आणि आश्चर्य असे की त्यानंतर तो हंडा कण्यांचा न संपणारा पुरवठा करू लागला! (बाळू मामा १९९६, पृ२०६) या घटनेची उपपत्ती वरील घटनेप्रमाणे'अध्यात्मविज्ञानाचा (जादूचा) प्रयोग' याशिवाय दुसरी कोणती देता येते? (उपरोक्त ग्रंथात बाळूमामांच्या अशाच प्रकारच्या इतरही अनेक चमत्कारांच्या घटना सांगितल्या आहेत, ज्या वास्तविक अध्यात्माच्या पातळीवर मुळीच चमत्कार नाहीत) संत किंवा सत्पुरुष किंवा जादूगारच नव्हे तर सामान्य माणसे सुद्धा भक्तीने, श्रद्धेने असले आत्मशक्तीचे(आध्यात्मिक) प्रयोग(अर्थात अजाणतेपणे) करू शकत असल्याच्या अनेक घटनांची उदाहरणे प्रस्तुत लेखकाच्या' विज्ञान आणि चमत्कार' या एका(‘किंवा चमत्कारांचे वास्तव’ व ‘चमत्कारांचे विज्ञान’ या दोन) ग्रंथात दिली असून ती सर्व उदाहरणे या विश्वाचे कार्य, ज्यात जैविक उत्क्रांती कार्याचाही समावेश होतो, बाह्यतःभौतिक( आंधळ्या) नियमानुसार चालत असल्याचे दिसत असले तरी मूलतः दैवी(आध्यात्मिक) नियमानुसार ( निसर्गतम्याकडून ) चालत असल्याचे सिद्ध करतात. अशारीतीने भौतिक विश्वाच्या पाठीमागे आध्यात्मिक (दैवी) शक्ती कार्यरत असल्यामुळे भौतिक वादावर व त्यावर आधारलेल्या डार्विनच्या उत्क्रांतीवादावर विश्वास ठेवणाऱ्या व जडतत्व व त्याचे आंधळे नियम हेच या विश्वाचे अंतिम सत्य मानणाऱ्या जीव व भौतशास्त्रज्ञांना म्हणूनच जीवाची उत्पत्ती पृथ्वीवर प्रथम कशी झाली हे न सुटलेले कोडे बनले आहे. ते तसे का बनले आहे याचा आता सहज उलगडा होतो. पाहा :

'चार्वाकवाद आणि अध्यात्म' या प्रस्तुत लेखकाच्या पुस्तकातील 'जीवोत्पत्ती: रूढ जीवशास्त्राला न सुटलेले कोडे' हे प्रकरण, ज्यात या प्रश्नाचे सोपपत्तिक विवरण केले आहे.

...

## प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या आगामी पुस्तकातील

